प्रकाशक

हरेश विजय तुपे

ई-लेखणी महाराष्ट्र प्रकाशन

प्रकाशन क्रमांक – १

२८-०१-२०२०

elekhanimaharashtra@gmail.com

संकलन आणि लेखन – हरेश वि.तुपे

भेट – २६-०१-२०२०

ई-लेखणी महाराष्ट्र प्रकाशने प्रकाशित केलेले साहित्य पुढील google drive लिंक वर सुद्धा प्रकाशित केलेले असेल.

https://drive.google.com/open?id=1QumTQygiJ2CByv2-WMwenW717N4OgW7R

अंबरनाथचे हे शिवमंदिर शिलाहारकालीन असून स्थापत्यकलेचा उत्कृष्ट नमूना आहे. हे मंदिर संपूर्णपणे एका दगडात कोरण्यात आले आहे. त्यावर विविध प्रकारच्या लहानमोठय़ा अशा हजारो मूर्ती असून शिल्पकला, वास्तुकला आणि कोरीवकाम यांचा सुरेख संगम या मंदिराच्या बाह्य आणि अंतर्भागात पाहायला मिळतो. तर मंदिराचा गाभाराही तळघरात असून त्यासाठी १२ पाय-या उतरून खाली जावे लागते. तेथील भगवान महादेवाची प्राचीन पिंड पाहून मन प्रसन्न होते.

ह्या मंदिराचे निर्माण कार्य ११ व्या शतकात इसवी सन १०६१ मध्ये करण्यात आले. शिलहारच्या मिळालेल्या एका शिललेखावर त्याचे उल्लेख सापडतात.

मंदिराची स्थापत्य रचना -

हे शिवमंदिर चे शिखर भूमिज प्रकारच्या बांधकाम शैली मध्ये मोडते. या मंदिराचे शिखर पूर्ण पाहावयास मिळत नाही. तरी जर हे शिखर पूर्ण असते तर ते उदयपुर, मध्यप्रदेश येथील असलेल्या नीलकंठेश्वर मंदिर सारखे दिसले असते.





नीलकंठेश्वर मंदिर, उदयपुर मध्यप्रदेश

मंदिराचा मंडप अष्टकोणी असून प्रमुख प्रवेशद्वार पश्चिम दिशेला असून त्याशिवाय उत्तर व दक्षिण बाजूस आणखीन दोन प्रवेशद्वारे मंदिराला आहेत. मंदिराच्या बाहेरील भिंतीस एकूण २६ मनोरे आहेत. मंडपाच्या मध्य भागी मुख्य शिखर आहे. द्रोण कॅमेरा द्वारे पाहिल्यास ह्या मुख्य शिखराच्या बाजूसही लहान लहान शिखरे समांतर ओळीने पाहावयास मिळतात. मंदिर उभारताना गणिताचा विशेषत: भूमितीचा वास्तुशास्त्रात विचार केला गेलेला आहे. हे येथील स्थापत्यशास्त्राचा थोडा अभ्यास केल्यास हे आपल्याला हे सहज लक्षात येते.




मंदिराबाहेरील असलेल्या मनोऱ्यांवर अनेक हिंदु देवदेवतांच्या दगडी शिल्पाचे कोरीवकाम आहे. या शिल्पांमध्ये गरुडासन विष्णू, शिव, पार्वती, शिव-पार्वती विवाह सोहळा, त्रिपुरा वध मूर्ती, पार्वती चामुंडा, नृत्यांगना, द्वारपाल, विष्णू, नटराज, कालीमाता, गणेश नृत्यमूर्ती, नृसिंह अवताराची मूर्ती, महिषासुर र्मदिनी या मूर्ती अत्यंत कुशलतेने दगडातून साकारलेल्या आहे. विशेष म्हणजे दगडी कामातून त्या काळची वस्त्रे, आभूषणे आणि वेशभूषाही साकारलेल्या आहेत. पौराणिक कथा, नृत्यात मग्न असलेली शिल्पे, हातात आयुधे घेतलेली शिल्पे, गजशिल्प असी शिल्पकृती येथे आपणास पहावयास मिळते. या सर्व शिल्पांचे एकत्रित संकलन करणे गरजेचे आहे.

मंदिरात प्रवेश करताना समोर प्रवेशद्वारापाशी दोन नंदी आहेत. मंदिराच्या सभामंडपात एकूण ८ खांब आहेत. त्या वर देखील केलेली शिल्पकला लक्ष वेधून घेते. मध्यभागावरील दगडी झुंबर त्याच्या भोवतालची वतुर्ळे, घुमटाकृती नक्षीकाम फारच सुंदर आहे. सभामंडपापासून दहा बारा पायऱ्या खाली उतरल्यावर आपण गाभाऱ्यात येतो. याच गाभाऱ्यात स्वयंभू शिवलिंग आहे ज्यास आंबरेश्वर शिवलिंग असेही म्हंटले जाते. गाभारा एखाद्या खोल विहिरीसारखा भासतो, गाभाऱ्यातून वर पाहिल्यास आकाश दर्शन होते. मंदिराच्या बाहेरच्या बाजूस आपल्याला गोड्या पाण्याचे कुंड पाहायला मिळतात.



आंतरजाळात शोध घेताना शिव मदिराचे जुने चित्र ,कलाकृती पाहावयास मिळतात. त्यापैकि १८७८ मध्ये लाकडामध्ये कोरीवकाम केलेले मंदिराची सुबक कलाकृती पाहावयास मिळते.

"Temple of Ambernath near Callian," a wood engraving by E. Therond, 1878*

https://peopleofindia1868-1875photos.blogspot.com/2010/12/temple-of-ambernath-near-callian-wood.html



१८५५ मधील काढलेले छायाचित्र

https://twitter.com/mumbaiheritage/status/567696288171302914

क्रमांक १



*Ruined Temple of Ambernath, near Callian—Side View*

क्रमांक ३

पुढील छायाचित्र कधीचे आहे हे माहीत नाही.

